मुंबई भेटीवर येणाऱ्या मान्यवर अतिथींच्या परिवहन व्यवस्थेकरिता नविन वाहने खरेदी करण्यास मंजूरी देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वाहन-२०१४/प्र.क्र.४३/का.३१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-०९ जानेवारी, २०१७.

वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक :- वाहन २०१४/प्र.क्र.४३/का.३१, दि.२४.०७.२०१५.
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. वाहन २०१४/प्र.क्र.४३/का.३१, दि. १५.०१.२०१६.
३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. वाहन २०१४/प्र.क्र.४३/का.३१, दि. ११.०७.२०१६.

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार) या विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयामार्फत, मुंबई येथे भेट देणाऱ्या अति-अति महत्वाच्या व्यक्ती, राज्य अतिथी इत्यादी मान्यवरांच्या परिवहनव्यवस्थेसाठी, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई या कार्यालयाच्या अधिनस्त डी. व्ही. वाहनांचा ताफा ठेवण्यात येतो. सदर वाहनांच्या परिरक्षण व दुरूस्ती व इंधनाचा खर्च त्या कार्यालयामार्फत केला जातो. सदर राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीने शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयासाठी एकूण ५४ वाहनांच्या आढाव्यास मान्यता दिली असून त्या कार्यालयातील निर्लेखित केलेल्या एकूण १८ वाहनापैकी एकूण १७ वाहने (१५ डी. व्ही. कार, १ टोईंग व्हॅन, (मध्यम आकाराची) व १- बस) खरेदीसह मान्यता दिली आहे. त्याबाबतचा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. वाहन २०१४/प्र.क्र.४३/का.३१, दि.२४.०७.२०१५ अन्वये, निर्गमित केला आहे. त्यापैकी संदर्भाधिन क्र. २ व ३ येथील शासन निर्णयान्वये १० वाहने खरेदी करण्यात आली असून आता राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीने दिलेल्या मान्यतेप्रमाणे, शासकीय परिहवन सेवा, मुंबई या कार्यालयासाठी सद्य:स्थितीत उर्वरीत वाहनापैकी ५ वाहने खरेदी करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

शासकीय परिवहन सेवा, मुंबई या कार्यालयासाठी राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीने एकूण ५४ वाहना आढावा मंजूर केलेला आहे. त्यापैकी निर्लेखित केलेल्या १८ वाहनाऐवजी वाहन धोरण आढावा समितीने एकूण १७ वाहने (१५ डी. व्ही. कार, १ टोईंग व्हॅन, (मध्यम आकाराची) व १- बस) खरेदीस मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून शासकीय परिहवन सेवा, मुंबई या कार्यालयासाठी सध्या उपलब्ध असलेल्या तरतूदींमधून वाहन उत्पादक कंपनीने सूचविलेल्या अधिकृत पुरवठादाराकडून **"एकलस्त्रोत"** पध्दतीने खालील तक्त्यात नमूद केलेल्या प्रकारची एकूण **५ वाहने** (Model No. Skoda Rapid 1.5 TDI AMBITION (MT)) ही M/s Auto Bahn Enterprises Pvt Ltd. Prabhadevi, Mumbai-25 या पुरवठादाराकडून खरेदी करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर वाहने खरेदी करण्यासाठी येणाऱ्या **रू. ४९,०१,२४५/- (एकूण रूपये एकोणपन्नास लाख एक हजार दोनशे पंचेचाळीस फक्त ) (व्हॅटसह) एवढया खर्चास या शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.**

| Sr. No. | Model No. | Details | Rate (Single Unit | No. of Cars | Total Amount Rs |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Skoda Rapid 1.5 TDI AMBITION (MT) | Basic Price | 897618 | **5** | **49,01,245** |
| | | Vat | 126631 | | |
| | | Depot | 6,000 | | |
| | | Discount | 50000 | | |
| | | **Total** | **980249** | | |
| | **Total (Rs Forty nine lakh one thousand Eighty two hundred forty five only)** | | | | **49,01,245** |

२. उपरोक्त वाहनांच्या खरेदीसाठी होणारा खर्च भागविण्यासाठी संक्षिप्त देयकाद्वारे आहरित करण्यास वित्त विभाग ( विनियम कार्यासन) यांनी त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५८०/१६, विनियम दि. २४.१२.२०१६अन्वये खालील अटींच्या अधिन राहून मान्यता दिली आहे.

(१) शासन परिपत्रक क्र. मुंविनि-१०१६/प्र.क्र.६/१६/विनियम, दि. ४ मार्च, २०१६ मधील सूचनेनुसार (२०५२ ००८१) या लेखाशिर्षाखाली दि. ३१.०३.२०१५ यापूर्वीचे तपशीलवार देयक प्रलंबित नाही.

(२) या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

(३) खर्च नियमत देयकाद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

(४) या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची व्यक्तीगत जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

(५) मासिक निधी विवरणपत्रानुसार याकरीता निधी उपलब्ध आहे.

३. वित्त विभागाच्या उपरोक्त मान्यतेनुसार वाहन खरेदीसाठी येणाऱ्या खर्चाचे देयक संक्षिप्त देयकावर काढण्यास याद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. उपरोक्त खर्च भागविण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री अ. भि. मोरे, कक्ष अधिकारी, कार्यासन-३१ सामान्य प्रशासन विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री स. का. जोंधळे, उप सचिव सामान्य प्रशासन विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. M/s Auto bahn Enterprises Pvt Ltd. Prabhadevi, Mumbai-25 यांनी Skoda Rapid 1.5 TDI AMBITION (MT) (पांढरा रंग) या बनावटीच्या ५ वाहनांचा पुरवठा तात्काळ नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांना करावा.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च “मागणी क्र. ए-४, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा (०९०) सचिवालय (००) (०६) विख्यात अभ्यगंतासाठी वाहन खरेदी -५१ मोटार वाहने सांकेताक क्रमांक २०५२००८१ ” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व **सन २०१६-१७** या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७०२/व्यय-४ दि. २४.१२.२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र. १९-ब, नियम क्र. ६९ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०१०९१२३३५८२२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Arvind Bhimrao More

Digitally signed by Arvind Bhimrao More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246b8ccd2e2cb10707678d45ea1ad26cc1e4d7bff7bd2aa1f253a716b8c448b, cn=Arvind Bhimrao More
Date: 2017.01.09 12:39:36 +05'30'

(अ.भि.मोरे)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
४. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई,
५. कक्ष अधिकारी,कार्यासन-२५ व ३०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. कक्ष अधिकारी वित्त विभाग, व्यय-४/विनियम, मंत्रालय, मुंबई
7. M/s Auto bahn Enterprises Pvt Ltd. Prabhadevi, Mumbai-25
८. निवडनस्ती/(का.३१).